अ.भा.से.(कार्य मुल्यांकन अहवाल) नियम, २००७ प्रमाणे भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांनी करुन घ्यावयाच्या वैद्यकीय चाचण्या - अतिरिक्त चाचण्यांची प्रतिपूर्ती

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्र.- भाप्रसे-२००९/प्र.क्र.१४३/०९/९,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :०१.०२.२०१०

वाचा :- सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.-भाप्रसे-२००७/प्र.क्र.१९२/०७/९, दि.०४.०१.२०१०

**प्रस्तावना :-**

अखिल भारतीय सेवा (कार्य मुल्यांकन अहवाल) नियम, २००७ हे नियम भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिकाऱ्यांसाठी सन २००७-०८ या वर्षापासून लागू करण्यात आलेले आहेत. या नियमांप्रमाणे ४० वर्षावरील वयाच्या भा.प्र.से. अधिकाऱ्यांनी त्यांच्या वैद्यकीय तपासण्या, ठरवून दिलेल्या नमुन्यात, प्रतिवर्षी करुन घेणे बंधनकारक असून, त्यांचे वैद्यकीय तपासणीच्या अहवालाचा सारांश, वार्षिक कार्यमुल्यांकन अहवालासोबत जोडणे आवश्यक आहे. त्यानुसार महाराष्ट्र संवर्गातील संबंधित भा.प्र.से.अधिकाऱ्यांनी करुन घेतलेल्या विहित वैद्यकीय चाचण्यांच्या खर्चाची प्रतिपूर्ती संबंधित अधिकाऱ्यांना अनुज्ञेय आहे. तथापि, आता शासनाच्या असे निदर्शनास आणण्यात आले आहे की, संबंधित अधिकारी, विहित केलेल्या वैद्यकीय चाचण्या करुन घेण्यासाठी रुग्णालयात गेले असता, तपासणीअंती आवश्यकतेनुसार शासनाने विहित केलेल्या वैद्यकीय चाचण्यांव्यतिरिक्त काही अतिरिक्त वैद्यकीय चाचण्या करुन घेण्याच्या सूचना वैद्यकीय अधिकाऱ्यांकडून / रुग्णालयांकडून संबंधित भा.प्र.से. अधिकाऱ्यांस देण्यात येत आहेत. सदर बाब आरोग्य विषयक असल्याने सूचित करण्यात आलेल्या वैद्यकीय चाचण्या करुन घेणे संबंधित भा.प्र.से. अधिकाऱ्यास आवश्यक ठरत आहे. हे लक्षात घेता, शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

शासनाने विहित केल्यानुसार, अखिल भारतीय सेवा (कार्य मुल्यांकन अहवाल) नियम, २००७ नुसार, वयाच्या ४० वर्षावरील भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिकाऱ्यांनी करुन घ्यावयाच्या विहित वैद्यकीय चाचण्यांव्यतिरिक्त, वैद्यकीय तपासणीच्यावेळी संबंधित वैद्यकीय अधिकाऱ्यांनी / रुग्णालयाने काही अतिरिक्त वैद्यकीय चाचण्या करुन घेण्याच्या लेखी सुचना दिल्यास, अशा सूचित केलेल्या अतिरिक्त वैद्यकीय चाचण्या करुन घेण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. अतिरिक्त वैद्यकीय चाचण्यांसाठी आवश्यक असलेली रक्कम संबंधित भा.प्र.से. अधिकाऱ्यांनी प्रथम स्वतः अदा करावी व त्याची प्रतिपूर्ती आपल्या कार्यालयाकडून मिळवावी. मात्र अशा अतिरिक्त वैद्यकीय चाचण्यांकरिता रु.१०००/- पर्यंत केलेल्या खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय राहिल.

३. यावरील खर्च संबंधित अधिकाऱ्याच्या आस्थापनेवरील वेतन व भत्त्यासाठी लागू असलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या-त्या वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र. ४८२/सेवा-५, दिनांक ८.१.२०१० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या w.w.w.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्र. २०१००२०११६५३२५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रो.स.भालेकर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
२ महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
३ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
४ महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
५ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६ सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
७ महाराष्ट्र संवर्गातील ४० वर्षे वयावरील भारतीय प्रशासकीय सेवेतील सर्व अधिकारी,
८ संबंधित आहरण व संवितरण अधिकारी,
९ सर्व मंत्रालयीन विभाग / रोख शाखा
१० निवड नस्ती

-------